महाराष्ट्र शासन

क्रमांक : रामग्र २०११/(३३/११)/साशि-५
उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २८ जानेवारी २०११

विषय : ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील
राज्यमध्यवर्ती ग्रंथालय, मुंबई साठी संगणक व इतर साहित्य खरेदी करणेबाबत.

संदर्भ : १) ग्रंथालय संचालनालयाचे क्र. ५५/रामग्रं/२०१०-११/१४३८८,
दि.२८/०१/२०११ चे पत्र

**प्रस्तावना :-** ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, मुंबई या कार्यालयाचे संगणकीकरण करण्यासंदर्भात संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये ग्रंथालय संचालकांनी विनंती केल्यानुसार सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**ज्ञापन :**

ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील राज्य मध्यवर्ती ग्रंथालयासाठी १५ संगणक संच व ४ प्रिंटर्स ची खरेदी करणे, तसेच संगणक संच, प्रिंटर्स इ. ची शासनाने निश्चित केलेल्या दर करारानुसार LAN द्वारे जोडणी करुन घेण्याकरीता, लेखाशिर्ष " मागणी क्र. डब्ल्यू ४, २२०५ कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०३)(०९) राज्य मध्यवर्ती ग्रंथालयामध्ये संगणकीकृत ग्रंथालय, १७, संगणक खर्च (२२०५ ३०६ ३) १७, संगणक खर्च, " याखाली मंजूर रु. १०,००,०००/- (रु. दहा लक्ष फक्त) तरतूदीतून खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग २, अनुक्रमांक २८ अ, नियम क्रमांक ७६ अन्वये, प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मा. सचिव (उवतंशि) यांच्या मान्यतेने खर्च करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

अ) निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

ब) सदर खरेदी शासनाने निश्चित केलेल्या दरकरारानुसार करण्यात यावी.

३. सदरहू ज्ञापन शासनाचे WWW.maharastra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक 20110128210307001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

( बा. ओं. हेमाडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
ग्रंथालय सचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई
ग्रंथपाल वर्ग १, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, नगर भवन, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवडनस्ती साशि-५